ऊसाच्या चिपाडावर आधारित सहवीज निर्मितीच्या धोरणांतर्गत क्षमतेमध्ये वाढ आणि लघुजल विद्युत निर्मितीबाबतचे नवीन धोरण-२०१४

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
शासन निर्णय क्रमांकः अपाऊ-२०१४/प्र.क्र. १४४/२०१४/ऊर्जा-७
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दि. ३० ऑगस्ट, २०१४.

**संदर्भ** : १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. अपाऊ-२००७/प्र.क्र.६९३/ऊर्जा-७, दिनांक १४ ऑक्टोबर, २००८
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. पवन २०१०/प्र.क्र.१३४/ऊर्जा-७, दिनांक १४ जुलै, २०१०.

**प्रस्तावना:-**

शासनाने नवीन व नवीकरणीय ऊर्जा म्हणजे अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांच्या विकासासाठी वेळोवेळी प्रोत्साहनात्मक धोरणे जाहीर केली आहेत. या धोरणांमुळे राज्यात स्वच्छ व पर्यावरण पोषक अशा नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीचे प्रकल्प मोठ्या प्रमाणात कार्यान्वित झाले आहेत. सद्य:स्थितीत अपारंपरिक ऊर्जेपासून वीज निर्मितीमध्ये पारेषण संलग्न प्रकल्पांबाबत महाराष्ट्र राज्य देशात अग्रेसर आहे.

महाराष्ट्र वीज नियामक आयोगाने विविध पारेषण संलग्न नवीन व नवीकरणीय ऊर्जा प्रकल्पांसाठी वीज खरेदीचे दर तसेच अनुषंगिक नियम व अटी याबाबत आदेश वेळोवेळी निर्गमित केले आहेत. याद्वारे राज्यामधील वीज वितरण परवानाधारकांना व विनिर्दिष्ट घटकांना नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांतून निर्माण केलेल्या विजेची खरेदी विहित प्रमाणात करण्यास नित्यनूतनशील वीज खरेदी बंधन (RPO) द्वारे बंधनकारक केले आहे. वरील बाबी लक्षात घेता राज्यात अधिकाधिक अपारंपरिक स्त्रोतांपासून ऊर्जा निर्माण करणारे प्रकल्प आस्थापित होणे गरजेचे आहे.

या अगोदरच्या दि.१४.१०.२००८ च्या शासन निर्णयान्वये ऊसाच्या चिपाडावर आधारित सहवीज निर्मिती प्रकल्पाचे निश्चित केलेले उद्दिष्ट पूर्ण झाले असून त्या प्रकल्पांचा विकास जलद गतीने होण्यासाठी आणि लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांसंदर्भात केंद्र शासनाच्या योजनांच्या धर्तीवर राज्य शासनाच्या प्रचलित धोरणामध्ये सुधारणा करून नव्याने धोरण निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने दि.१३.८.२०१४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत ऊसाच्या चिपाडावर आधारित सहवीज निर्मितीमध्ये क्षमतेमध्ये वाढ करण्याबाबत आणि लघु जल विद्युत निर्मितीबाबतच्या नवीन धोरणावर चर्चा होऊन उक्त प्रस्तावास मान्यता दिली आहे.

## शासन निर्णय:-

१. राज्यात १००० मे.वॅ. वाढीव क्षमतेचे ऊसाच्या चिपाडावर आधारित सहवीज निर्मिती प्रकल्प तसेच २०० मे.वॅ. क्षमतेचे लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्प तीन वर्षांच्या कालावधीत कार्यान्वित करण्याचे उद्दिष्ट या धोरणान्वये निश्चित करण्यात येत आहे.

२. ऊसाच्या चिपाडावर आधारित सहवीज निर्मिती / वीज निर्मितीसाठी दि.१४-१०-२००८ च्या धोरणांतर्गत निश्चित केलेले १००० मे.वॅ. चे उद्दिष्ट पूर्ण झाले असून सदरच्या नवीन धोरणांतर्गत वाढीव १००० मे. वॅ. क्षमतेचे उद्दिष्ट निश्चित करणे, सदर वाढीव १००० मे. वॅ. क्षमतेच्या सहवीज निर्मिती/वीज निर्मिती प्रकल्पांसाठी शासन निर्णय क्र.अपाऊ-२००७/ प्रक्र.६९३/ऊर्जा-७ दि. १४-१०-२००८मधील तरतूदी आणि शासन निर्णय, क्र.पवन-२०१०/प्र.क्र.१३४/ऊर्जा-७, दि.१४-०७-२०१० मधील परिशिष्ट-ब मधील तरतुदी तसेच इतर तद्नुषंगिक शासन निर्णयान्वये जाहीर केलेल्या सहवीज निर्मिती प्रकल्पांशी संबंधित तरतुदी जशाच्या तशा लागू राहतील.

### ३. लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांसंदर्भात खालील तरतुदी लागू राहतील :-

अ) सदर नवीन धोरणांतर्गत २५ मे.वॅ. क्षमतेपर्यंतच्या सर्व प्रकारच्या लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांचा समावेश करण्यात येत आहे.

ब) सदरच्या नवीन धोरणांतर्गत द्यावयाच्या प्रोत्साहनात्मक बाबी महाऊर्जाकडून दि. १ एप्रिल,२०१४ पासून मंजूर प्रकल्प प्रस्तावांच्या बाबतीत लागू राहतील.

क) सदरच्या नवीन धोरणांतर्गत लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांद्वारे निर्माण होणारी १०० टक्के वीज राज्यातील कोणत्याही वीज वितरण परवानाधारक कंपनीस किंवा ग्राहकास विक्री केल्यासच सदर धोरणातील प्रोत्साहनात्मक बाबी देय होतील.

ड) सदरच्या नवीन धोरणांतर्गत विकसित होणा-या लघु जल विद्युत प्रकल्पांना खालीलप्रमाणे नमूद केलेल्या तरतूदी तसेच प्रोत्साहनात्मक बाबी लागू राहतील :-

i) प्रकल्पासाठी लागणाऱ्या लघु दाब, उच्च दाब आणि अति उच्च दाब केंद्रांचे व त्यांना लागणा-या पारेषण व वितरण वाहिन्यांचे सर्वेक्षण महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी/महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांनी संयुक्तपणे करावे. सर्वेक्षणाप्रमाणे उभारण्यात येणारी उच्च दाब व अति उच्च दाब उपकेंद्रे, त्यांना लागणा-या अति उच्च दाबाच्या पारेषण व वितरण वाहिन्यांची कामे प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी/महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांच्या तांत्रिक परिमाणानुसार (Technical Specifications) व त्यांनी मान्य केलेल्या अंदाजपत्रकानुसार तसेच महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी/महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या देखरेखीखाली करुन घ्यावी. या निष्कासन व्यवस्थेमध्ये अस्तित्वात असलेली उपकेंद्रे आणि पारेषण व वितरण वाहिन्यांमध्ये जे काही सुदृढीकरण अथवा बदल करावे लागतील त्यांचाही समावेश असेल.

ii) प्रकल्पांच्या ठिकाणापासून ते लघु दाब, उच्च दाब व अति उच्च दाब उपकेंद्रापर्यंत जोडल्या जाणा-या ११ केव्ही व त्यापेक्षा अधिक दाबाच्या वाहिन्यांचा समावेश या निष्कासन व्यवस्थेमध्ये असेल.

iii) निष्कासन व्यवस्था कार्यान्वित झाल्यावर महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीकडे हस्तांतरित करण्यात येईल. निष्कासन व्यवस्थेची मालकी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीकडे राहील. तसेच त्याची देखभाल व दुरुस्ती महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीद्वारे केली जाईल.

iv) महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीने प्रमाणित केलेली कंपनीच्या मान्यताप्राप्त अंदाजपत्रकातील रक्कम व प्रकल्प विकासकाने स्व:खर्चाने उभारलेल्या निष्कासन व्यवस्थेवर झालेला प्रत्यक्ष प्रमाणित खर्च किंवा प्रति प्रकल्प कमाल रु.२.०० कोटी यांपैकी जी कमी असेल ती रक्कम निष्कासन व्यवस्थेचा खर्च म्हणून गृहित धरली जाईल.

v) सदर निष्कासन व्यवस्था महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीकडे पूर्णत: हस्तांतरित झाल्यानंतर प्रकल्प विकासक / प्रकल्पधारकाने स्व:खर्चाने उभारुन कार्यान्वित केलेल्या निष्कासन व्यवस्थेवर झालेला प्रत्यक्ष प्रमाणित खर्च किंवा प्रति प्रकल्प कमाल रु.२.०० कोटी यांपैकी जी कमी असेल ती रक्कम प्रकल्प विकासकास अर्थसहाय्य म्हणून महाऊर्जाकडून हरित ऊर्जा निधीमधून परतावा स्वरुपात निधीच्या उपलब्धतेनुसार तसेच संबंधितांकडून प्रमाणित रक्कम व हस्तांतरणाची कागदपत्रे प्राप्त झाल्यानंतर वितरीत करण्यात येईल.

vi) सदर नवीन धोरणांतर्गत मंजूर केलेल्या लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांना भांडवली अनुदान देय राहील. सदर भांडवली अनुदान रू. १०,०००/- प्रति कि.वॅ. प्रमाणे परंतु कमाल रु. ३.०० कोटी प्रति प्रकल्प एवढे देण्यात येईल.

सदर भांडवली अनुदान प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर तसेच प्रकल्प कार्यान्वित झाल्याचे व ग्रिडमध्ये वीज पारेषित करण्यात येत असल्याचे संबंधित पारेषण / वितरण कंपनीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर प्रकल्प विकासकास महाऊर्जाकडून हरित ऊर्जा निधीमधून निधीच्या उपलब्धतेनुसार वितरित करण्यात येईल.

vii) सदर नवीन धोरणांतर्गत लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांना द्यावयाच्या प्रोत्साहनात्मक बाबींकरिता शासन निर्णय क्र.पवन-२०१०/प्र.क्र.१३४/ऊर्जा-७, दि.१४ जुलै,२०१० मधील परिशिष्ट-ड अंतर्गत प्रस्तावना व " प्रकल्पांतर्गत द्यावयाच्या सोयी व सवलती" या शीर्षाखालील संपूर्ण तपशील वगळता इतर सर्व तरतुदी; तसेच शासन निर्णय, क्र. पवन-२०१०/ प्र.क्र.४६५/ऊर्जा-७,दि.२८ डिसेंबर २०१०, शासन शुध्दिपत्रक क्र.अपाऊ-२०१२/प्र.क्र.२४५ /ऊर्जा-७, दि.५ फेब्रुवारी, २०१३ या शासन निर्णयांमधील सर्व तरतुदी कार्यपध्दती म्हणून सदर नवीन धोरणांतर्गत देखील लागू राहतील.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२५/१४/व्यय-१६, दि. २७ ऑगस्ट, २०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८३०१३०२०१८५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Sheshrao Mandwe

Digitally signed by Baban Sheshrao Mandwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labor, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Baban Sheshrao Mandwe
Date: 2014.08.30 17:05:29 +05'30'

**ब.शे.मांडवे**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई .
३. उपमुख्यमंत्री / सर्व मंत्री /सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (सहकार), सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग.
१०.विक्रीकर आयुक्त, माझगाव, मुंबई.
११.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४.सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने) .
१५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सुत्रधार कंपनी मर्या., मुंबई.
१६.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या., मुंबई.
१७.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या., मुंबई.
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई.
१९.महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे.
२०.ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१.निवड नस्ती-ऊर्जा-७ कार्यासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.